**वर्कप्लॅन अंतर्गत केंद्र पुरस्कृत तृणधान्य**
**विकास कार्यक्रम सन २०१०-११ मध्ये**
**राबविण्यास वित्तीय मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**कृषि,पशुसंवर्धन,दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक-तृधावि-१६१०/प्र.क्र. १८८/४-अे,**
**मंत्रालय विस्तार, मुंबई ४०००३२.**
**दिनांक :- ३१ जुलै, २०१०**

**संदर्भ :- १)** शासन निर्णय, कृषि व पदुम विभाग क्रमांक- सीपीपी-१६०९/सीआर-११८/४-अे, दिनांक २८ जुलै,२००९.
२) केंद्र शासन, कृषि मंत्रालय, कृषि व सहकार विभाग,नवी दिल्ली यांचे पत्र क्रमांक-६-३/२०१०, दिनांक ११ जून,२०१०
३) शासन निर्णय कृषि व पदुम विभाग क्रमांक तृविका- १६१०/प्र.क्र. १८८/४ अे,दिनांक २८ जून,२०१०
४) केंद्र शासन, कृषि मंत्रालय, कृषि व सहकार विभाग, नवी दिल्ली, यांचे पत्र क्र.६-६/२००९-एम एम, दिनांक १६ जून,२०१०.
५) कृषि व पदुम विभाग कार्यासन २-अे यांची दि.१७.७.२०१० ची टिप्पणी

**प्रस्तावना:-**

केंद्र पुरस्कृत तृणधान्य व ऊस विकास कार्यक्रम या करिता प्रात्यक्षिके व शेतकरी प्रशिक्षण ही केंद्र पुरस्कृत योजना राबविण्यात येत होती. सदर योजना सन २००४-२००५ पासून केंद्र पुरस्कृत तृणधान्य विकास कार्यक्रम योजना म्हणून राबविण्यात येत आहे. या योजनेच्या निधीत केंद्र व राज्य हिस्साचे प्रमाण ७५:२५ असे आहे. संदर्भाधीन शासन निर्णय दिनांक २८ जून,२०१० अन्वये सदर योजना सन २०१०-२०११ मध्ये राबविण्यास प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे.

केंद्रीय कृषि मंत्रालयाच्या संदर्भाधिन दिनांक ११ जून,२०१० च्या पत्रान्वये सन २०१०-११ मध्ये वर्कप्लॅन मधील योजनांना प्रशासकीय मान्यता देण्यात आलेली आहे. या योजनांमध्ये केंद्र पुरस्कृत तृणधान्य विकास कार्यक्रम या योजनेचा समावेश आहे. या योजनेकरिता केंद्र शासनाने त्यांच्या संदर्भाधीन दि. १६ जून,२०१० च्या पत्रान्वये वितरित केलेल्या पहिल्या हप्त्यातील अनुदानास अनुसरुन रु. ३१०.०० लाखाच्या (रुपये तीन कोटी दहा लाख फक्त) निधीच्या कार्यक्रमास वित्तीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

सन २००१०-११ या वर्षासाठी केंद्र शासनाने त्यांचे संदर्भाधीन पत्र दिनांक ११ जून,२०१० च्या पत्रान्वये केंद्र पुरस्कृत तृणधान्य विकास कार्यक्रम राबविण्यासाठी रुपये ११६८.९२ लाख (रुपये अकरा कोटी अडुसष्ट लाख ब्याण्णव हजार फक्त) एवढया कार्यक्रमास प्रशासकीय मान्यता दिली आहे. केंद्र शासनाची मान्यता लक्षात घेवून केंद्र पुरस्कृत

तृणधान्य विकास कार्यक्रम राज्यात राबविण्यास एकूण रुपये ११६८.९२ लाख (रुपये अकरा कोटी अडुसष्ट लाख ब्याण्णव हजार फक्त) इतक्या निधीच्या कार्यक्रमास संदर्भाधीन दि.२८.६.२०१० च्या शासन निर्णयान्वये शासनाची प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. या मंजूर निधीमध्ये केंद्र शासनाचा ७५ टक्के हिस्सा रुपये ८७६.६९ लाख (रुपये आठ कोटी श्याहत्तर लाख एकोणसत्तर हजार फक्त) व राज्य शासनाचा २५ टक्के हिस्सा रुपये २९२.२३ लाख (रुपये दोन कोटी ब्याण्णव लाख तेवीस हजार फक्त) इतका राहील. राज्य हिश्याच्या जिल्हा नियोजन व विकास समितीच्या अखत्यारितील तरतुदीस प्रशासकीय वित्तीय मान्यता देण्याचे अधिकार संबंधित जिल्हाधिकारी यांना आहेत. या योजनेबाबतच्या मार्गदर्शक सुचना संबधित जिल्हाधिकारी यांना उपलब्ध करून देण्यात याव्यात. सदर कार्यक्रमाची भौतिक व आर्थिक उद्दिष्टे व अनुदानाचा दर सोबतच्या परिशिष्ट "अ" मध्ये दर्शविण्यात आला आहे. केंद्र शासनाने दि.१६.६.२०१० च्या पत्रान्वये दिलेली वित्तीय मान्यता विचारात घेऊन, केंद्र हिश्श्यापोटी रु. ३१०.०० लाख (रु. तीन कोटी दहा लाख फक्त) निधीच्या कार्यक्रमाला वित्तीय मान्यता देण्यात येत आहे. या योजनेसाठी मंजूर केलेला निधी खालील लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा आणि सन २०१०-११ च्या मंजूर तरतूदीतून भागविण्यात यावा.

**अ) मागणी क्रमांक - डी -३, २४०१ पीक संवर्धन , १०२ अन्नधान्य पिके,**

**(केंद्र हिस्सा ७५ टक्के)**

**(००)(११) केंद्र पुरस्कृत योजना - तृणधान्य विकास कार्यक्रम (२४०१ ३०९१)**

**३३ अर्थसहाय्य. (रु. १८०.०० लाख)**

**ब) मागणी क्रमांक-डी -३, २४०१ पीक संवर्धन १०२ , अन्नधान्य पिके,**

**महाराष्ट्र जिल्हापरिषद. परिषद व पंचायत समित्या अधिनियम १९६१ च्या**

**कलम १२३ अन्वये जिल्हा परिषदांना अनुदान (स्थानीक क्षेत्रातील योजना)**

**(अर्थोपाय अग्रीमाशी समायोज्य )**

**(केंन्द हिस्सा) जिल्हा परिषद ना अर्थसहाय्य**

**(००)(२५) एकात्मिक तृणधान्य विकास कार्यक्रम.**

**(२४०१ ४६१४) (रु. १३०.०० लाख)**

**३१ सहाय्यक अनुदान**

२. या कार्यक्रमासाठी मंजूर केलेला निधी खर्च करण्यास **संचालक (विस्तार व प्रशिक्षण), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे** यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे तसेच मंजूर निधीचे

जिल्हा निहाय वितरण करण्यास **संचालक (विस्तार व प्रशिक्षण),कृषि आयुक्तालय, पुणे** यांना प्राधिकृत करण्यात येत आहे. या योजनेचा खर्च मासिक कॅश फ्लोच्या मर्यादेत राहील याची दक्षता घेण्याची व संगणकीय अर्थसंकल्पीय प्रणालीद्वारे वितरीत करण्याची जबाबदारी **संचालक (विस्तार व प्रशिक्षण) कृषि आयुक्तालय, पुणे** यांची राहील.

३. केंद्र पुरस्कृत तृणधान्य विकास कार्यक्रमाच्या उद्दिष्ट पूर्तीसाठी संचालक (विस्तार व प्रशिक्षण), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी केंद्र शासनाच्या संदर्भाधीन दिनांक ११ जून २०१० च्या पत्रान्वये निर्गमित केलेल्या मार्गदर्शक सूचना विचारात घेवून उद्दिष्ट निहाय सविस्तर मार्गदर्शक सूचना सर्व क्षेत्रीय अधिका-यांना निर्गमित कराव्यात. या मार्गदर्शक सूचना निर्गमित करतेवेळी पुढील प्रमुख बाबी अंतर्भूत करण्यात याव्या.

i) या योजनेंतर्गत प्रति शेतकरी/ बाब अनुदानाची कमाल मर्यादा २५ टक्के इतकी राहील.

ii) लाभार्थी निवडतांना अनुसूचित जाती / जमाती व भटक्या विमुक्त जाती / जमाती संवर्गातील लाभार्थी यांना प्राधान्य देण्यात यावे व अशा लाभार्थ्यांना देण्यात आलेल्यालाभाबाबत स्वतंत्र नोंदी ठेवाव्यात.

iii)मंजूर निधीपैकी अनुसूचित जाती / जमातीसाठी लोकसंख्येच्या प्रमाणात निधी खर्च करण्यातयावा.

iv)प्रत्येक जिल्हयाच्या विस्तार व फलोत्पादन आराखडयामध्ये या योजनेचा अंतर्भाव गरजेनुसार ठेवण्यात यावा.

v) या योजनेचे मूल्यमापन त्रयस्थ यंत्रणेकडून करुन घ्यावे.

vi) वैयक्तीक लाभार्थी निवडतांना महिला लाभार्थींना प्राधान्य देण्यात यावे. असे लार्भार्थी उपलब्ध न झाल्यास इतरांची निवड करण्यात यावी. महिला लाभार्थ्यांना देण्यात आलेल्या लाभाची स्वतंत्र नोंद ठेवण्यात यावी.

vii) सन २००९-१० मध्ये लाभ घेतलेल्या व २०१०-११ मध्ये वैयक्तिक लाभ दिलेल्या लाभधारकांची यादी तालुका कार्यालये / पंचायत समिती / जिल्हाधिकारी कार्यालयात लावण्यात यावी तसेच ती यादी कृषि विभागाच्या वेब साईटवर देखील देण्यात यावी.

४. केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सूचनांप्रमाणे या योजनेचा मासिक आर्थिक व भौतिक प्रगती अहवाल प्रत्येक महिन्याला विहित मुदतीत केंद्र शासनाला तसेच राज्य शासनाला सादर होईल याची दक्षता घेण्यात यावी.

५. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक-१५३ /१० / व्यय-१, दिनांक १७ जुलै,२०१० अन्वये दिलेल्या सहमतीनुसार व अपर मुख्य सचिव (कृषि) यांच्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

६ सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करून देण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०१००८०२१८१४४७००१ असा आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,**

**(वि.मा.बिवलकर)**
**कार्यासन अधिकारी,महाराष्ट्र शासन.**
**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**

प्रति,

आयुक्त कृषि, महाराष्ट्र राज्य, पुणे (५ प्रती).
संचालक (विस्तार व प्रशिक्षण), कृषि आयुक्तालय, पुणे.(१० प्रती)
सर्व संचालक / सहसंचालक, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे-१.
विभागीय आयुक्त (सर्व),
विभागीय कृषि सहसंचालक (सर्व).
जिल्हाधिकारी (सर्व) (बृहन्मुंबई व मुंबई उपनगर हे जिल्हे वगळून)
मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व)
जिल्हा कोषागार अधिकारी (सर्व))(बृहन्मुंबई व उपनगर हे जिल्हे वगळून)
जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी (सर्व))(बृहन्मुंबई व उपनगर हे जिल्हे वगळून)
कृषि विकास अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व) )
व्यवस्थापकीय संचालक, कृषि उद्योग विकास महामंडळ मर्यादित,आरे दुग्ध कॉलनी ,गोरेगांव(पूर्व),मुंबई ६५.
मुख्य लेखा व वित्त अधिकारी,जिल्हा परिषद(सर्व)
व्यवस्थापकीय संचालक, कृषि उद्योग विकास महामंडळ मर्यादित, आरे दुग्ध कॉलनी ,गोरेगांव(पूर्व),मुंबई ६५.
व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य बियाणे महामंडळ, महाबीज भवन,कृषि नगर,अकोला.
संचालक,लेखा व कोषागारे,संगणक कक्ष,नवीन प्रशासकीय भवन,पाचवा मजला,मंत्रालयासमोर,मुंबई(२ प्रतीत).
महालेखापाल (लेखा परिक्षा / लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र १/२,मुंबई / नागपूर.
महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मुंबई.
नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई ३२.
ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय,मुंबई.
सामाजिक न्याय, क्रिडा व विशेष सहाय्य विभागा, मंत्रालय, मुंबई ३२.
आदिवासी विकास विभाग, मंत्रालय,मुंबई ३२.
वित्त विभाग, व्यय-१, अर्थसंकल्प-३, अर्थसंकल्प-१२.
सर्व सह सचिव / उप सचिव/ अवर सचिव/कार्यासन अधिकारी,
कृषि व पदुम विभाग (कृषि व फलोत्पादन)
मा.मंत्री(कृषि) यांचे खाजगी सचिव.
मा.राज्यमंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव.
निवड नस्ती.

**शासन निर्णय क्र. तृधावि-१६१०/प्र.क्र.१८८/ ४-अे**
**दिनांकः- ३१ जुलै,२००९**
**परिशिष्ट- क"**

| **केंद्र पुरस्कृत तृणधान्य विकास कार्यक्रम सन २०१०-११ चा कार्यक्रम** | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| **अ.क्र.** | **बाब** | **अनुदानाचा दर** | | **२०१०-११** | |
| | | | | भौतिक लक्ष | आर्थिक लक्ष (रू. लाखांत ) |
| १ | क्षेत्रिय पिक प्रात्यक्षिके | सुधारित भात पिकासाठी रु.२५००/- प्रति प्रात्यक्षिक ०.४० हेक्टर क्षेत्रासाठी | संख्या | ४३७४ | १०९.३५ |
| | | संकरित भात तंत्रज्ञानाची प्रात्यक्षिके रु.३०००/- प्रति प्रात्यक्षिक ०.४० हेक्टर क्षेत्रासाठी | संख्या | ७२८ | २१.८५ |
| | | गहू व इतर तृणधान्य प्रात्यक्षिके रु.२०००/- प्रति प्रात्यक्षिक ०.४० हेक्टर क्षेत्रासाठी | संख्या | १६४५८ | ३२९.१६ |
| २ | संकरित भात बियाणांचे उत्नादनासाठी अर्थसहाय्य | रु.१०००/- प्र.क्विं. किंवा किंमतीच्या ५० टक्के यापैकी जे कमी असेल ते | क्विंटल | १६४० | १६.४० |
| ३ | संकरित भात बियाणांचे वाटपासाठी अर्थसहाय्य | रु.२०००/- प्र.क्विं. किंवा किंमतीच्या ५० टक्के यापैकी जे कमी असेल ते | क्विंटल | ५४७ | १०.९४ |
| ४ | बियाणे वाण बदल- बियाणे वितरण भात-१५००० ज्वारी-१२००० गहू-४४००० | रु. ५/- प्रति क्विंटल किंवा किमंतीच्या ५० टक्के यापैकी जे कमी असेल ते. | क्विंटल | ७७६४२ | ४२७.५८ |
| ५ | सुक्ष्म मूलद्रव्यांच्या वापरासाठी प्रोत्साहनपर अर्थसहाय्य (सुक्ष्म मूल द्रव्यांच्या कमतरता असणाऱ्या क्षेत्राकरिता ) | रु.५००/-प्र.हे. किंवा रकमेच्या ५० टक्के यापैकी जे कमी असेल ते. | हेक्टर | १०९३६ | ५४.६८ |
| ६ | गहू पिकास अम्लधर्मीय जमिनीत चुनाकळीच्या वापरासाठी अर्थसहाय्य | रु.५००/-प्र.हे. किंवा रकमेच्या ५० टक्के यापैकी जे कमी असेल ते. | हेक्टर | १०९३६ | ५४.६८ |
| ७ | पीक संरक्षण रासायनिक आणि जैविक औषधेच्या वापरासाठी अर्थसहाय्य (भात पिकासाठी ) | रु.५००/-प्र.हे. किंवा रकमेच्या ५० टक्के यापैकी जे कमी असेल ते. | हेक्टर | १०९३६ | ५४.६८ |
| ८ | शेतकरी शेतीशाळा अंतर्गत शेतकरी प्रशिक्षण | रु. १७०००/- प्रति प्रशिक्षण (पूर्ण रक्कम ) | संख्या | ५२७ | ८९.६० |
| **एकूण** | | | | | **११६८.९२** |
| **केंद्रहिस्सा** | | | | | **८७६.६९** |
| **राज्यहिस्सा** | | | | | **२९२.२३** |